**केंद्र शासनाच्या “भांडवली गुंतवणुकीसाठी राज्यांना विशेष सहाय्य २०२२-२३” या योजनेच्या भाग-६ (नागरी सुधारणा) अंतर्गत निधी वितरीत करणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन

**नगर विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः सिआयडी-३३२२/प्र.क्र.१९७/नवि-१०**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक : २८ मार्च, २०२३

**वाचा :-** १) भारत सरकार, वित्त मंत्रालय यांचे कार्यालयीन ज्ञापन क्र.F.No.४४(१)/PF-S/२०२२-२३ (CAPEX), दि.०६.०४.२०२२

२) वित्त विभाग शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०२०/प्र.क्र.५१/२०/कोषा प्रशा-५, दि.१३.३.२०२० व ३.३.२०२१

३) वित्त विभागाने शासन परिपत्रक क्र. संकीर्ण-२०२१/प्र.क्र.३५/कोषा प्रशा-४, दि. १.७.२०२१

४) शासन निर्णय क्र.सिआयडी-३३२२/प्र.क्र.९३/नवि-१०, दि.७.१०.२०२२ व दि.१७.१०.२०२२

५) वित्त विभाग, परिपत्रक क्र.अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दि.१६.३.२०२३

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाच्या "भांडवली गुंतवणुकीसाठी राज्यांना विशेष सहाय्य २०२२-२३" या योजनेंतर्गत राज्य शासनाच्या भांडवली गुंतवणूक प्रकल्पांसाठी ५० वर्षांच्या बिनव्याजी कर्जाच्या स्वरूपात आर्थिक सहाय्य प्रदान करण्यात येत आहे. यासंदर्भात केंद्र शासनाच्या व्यय विभागाने दिनांक ०६.०४.२०२२ रोजीच्या पत्रान्वये सदर योजनेची मार्गदर्शक तत्वे निर्गमित केली आहेत. या योजनेंतर्गत राज्यांना प्रदान करण्यात येणारा निधी राज्याच्या दीर्घकालीन फायद्यासाठी नवीन आणि चालू असलेल्या भांडवली प्रकल्पांसाठी वापरायचा आहे. सदर योजनेच्या भाग-६- नागरी सुधारणा (Urban Reforms) अंतर्गत निधी मंजूर करण्यात आला आहे. संबंधित विभागांनी खर्चाचे स्वतंत्र लेखाशीर्ष घेवून अर्थसंकल्पीय तरतूद करुन केंद्र शासनाच्या दि.२३.०३.२०२१ रोजीच्या केंद्र पुरस्कृत योजनांच्या निधी वाटपासंदर्भात विहीत कार्यप्रणालीचे व वित्त विभागाच्या संदर्भीत क्र.३, दि.१.७.२०२१ अन्वये निश्चित कार्यप्रणालीचे पालन करणे आवश्यक आहे. नगर विकास विभागास प्राप्त होणारा निधी अर्थसंकल्पीत करुन वितरित करणेसाठी संदर्भीय क्र.३ च्या शासन निर्णयान्वये "नोडल अधिकारी" यांची नेमणुक करण्यात आली आहे.

**०२.** केंद्र शासनाच्या "भांडवली गुंतवणुकीसाठी राज्यांना विशेष सहाय्य २०२२-२३" या योजनेच्या भाग-६ (नागरी सुधारणा) अंतर्गत नगर विकास विभागासाठी एकूण ७८९.३० कोटी निधी मंजूर करण्यात आला आहे. तथापि, "४२१७०८३७" या लेखाशिर्षाखाली चालू वर्षी रु.७०० कोटीची तरतूद उपलब्ध

असल्याने मंजूर रकमेपैकी एकूण रू.७८०.०८ कोटी इतका निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे. त्यानुषंगांने पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहेः-

**शासन निर्णय : -**

१. केंद्र शासनाच्या राज्यांना भांडवली खर्चासाठी विशेष सहाय्य २०२२-२३ या योजनेच्या भाग-६ अंतर्गत केंद्र शासनाने मंजूर केलेल्या निधीनुसार सन २०२२-२३ या चालू वित्तीय वर्षातील अर्थसंकल्पीय तरतूदीमधून **रु.७८०,०८,००,००० /- (अक्षरी रुपये सातशे ऐंशी कोटी आठ लाख फक्त)** निधी प्रकल्पनिहाय वितरीत करण्यास खालीलप्रमाणे मान्यता देण्यात येत आहे.

| अ. क्र. | प्रकल्पाचे नाव | लेखाशिर्ष | या आदेशाद्वारे वितरीत रक्कम (रू.कोटी) | अंमलबजावणी यंत्रणा |
|---|---|---|---|---|
| १ | GIS based D.P. for 50 town (Municipal Corporations & Municipal Councils), which are due for revision | ४२१७०८३७ | ५४.६२ | संचालक, नगर रचना आणि मुल्यनिर्धारण विभाग, पुणे |
| २ | D.P. implementation in Municipal Councils & Nagar Panchayats (100 Towns) | ४२१७०८३७ | ५४५.३८ | |
| ३ | T.P. Schemes (Planning & Implementation) | ४२१७०८३७ | १०० | |
| ४ | T.P.S. Implementation CIDCO/ NAINA Area & PMRDA | ६२१७०९९३ | ८०.०८ | सिडको |
| | **एकूण** | | **७८०.०८** | |

२. उपरोक्त तक्त्यातील अ.क्र.१, २ व ३ मधील प्रकल्पांसाठी वितरीत केलेला निधी " मागणी क्रमांक- एफ ०५, ४२१७- नगर विकासावरील भांडवली खर्च ०१, राज्य भांडवली विकास ०५१, बांधकामे (०१) केंद्र शासनाकडून राज्यांना भांडवली गुंतवणूकीसाठी विशेष सहाय्य योजनेंतर्गत बिनव्याजी कर्ज (केंद्र हिस्सा १०० %) (०१) (०१) संचालक नगर रचना (कार्यक्रम) (४२१७०८३७), ५३ मोठी बांधकामे" या लेखाशिर्षाखाली सन २०२२-२३ मधील मंजूर अर्थसंकल्पीय तरतूदीतून खर्ची घालण्यात यावा.

३. उपरोक्त तक्त्यातील अ.क्र. ४ मधील प्रकल्पांसाठी वितरीत केलेला निधी " मागणी क्रमांक - एफ ०७, ६२१७, नगर विकासासाठी कर्जे ०१, राज्य भांडवली विकास १९०, सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमांसाठी कर्जे (०१) केंद्र शासनाकडून राज्यांना भांडवली गुंतवणूकीसाठी विशेष सहाय्य योजनेंतर्गत बिनव्याजी कर्ज (केंद्र हिस्सा १००%) (०१) (०३) नागरी सुधारणा (योजना भाग-

६) (कार्यक्रम) (६२१७०९९३), ५५ कर्जे व आगाऊ रकमा ” या लेखाशिर्षाखाली सन २०२२-२३ मधील मंजूर अर्थसंकल्पीय तरतूदीतून खर्ची घालण्यात यावा.

४. उपरोक्त लेखाशीर्षाखालील निधी आहरित करण्यासाठी नगर विकास विभागाचे कक्ष अधिकारी, नवि-५ (रोखशाखा), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांना “आहरण व संवितरण अधिकारी” तसेच सह/उप सचिव (नवि-१०), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांना “नियंत्रक अधिकारी” म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. प्रस्तुत शासन निर्णयातील परिच्छेद क्र. १ मध्ये प्रस्तावित करण्यात आलेली रक्कम आहरण व संवितरण अधिकारी यांनी अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांचेकडे देयके सादर करून प्राप्त निधी सिडको महामंडळ व संचालक, नगर रचना आणि मुल्यनिर्धारण विभाग, पुणे यांना वितरीत करण्याचे अधिकार प्रदान करण्यात येत आहेत. याबाबतच्या खर्चमेळाची कार्यवाही -नवि-३१० कार्यासनाने करावी. सदरचे निधी वितरण हे बिनशर्त स्वरुपाचे आहे.

६. केंद्र शासनाच्या राज्यांना भांडवली खर्चासाठी विशेष सहाय्य योजनेच्या भाग-६ अंतर्गत वितरीत करण्यात आलेल्या निधी संदर्भात सिडको महामंडळ व संचालक, नगर रचना आणि मुल्यनिर्धारण विभाग, पुणे यांनी महालेखापाल यांनी विहित केलेल्या नमुन्यात स्वतंत्र लेखे ठेवावेत.

७. केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचना व निधी मंजूरी आदेशानुसार सदरचा निधी दि.३१.३.२०२३ पर्यंत खर्च करणे बंधनकारक आहे.

८. केंद्र शासनाने ज्या प्रकल्पांसाठी निधी मंजूर केला आहे, त्याच प्रकल्पांसाठी व त्यातील प्रयोजनासाठीच निधी खर्च होईल याची सिडको महामंडळ व संचालक, नगर रचना आणि मुल्यनिर्धारण विभाग, पुणे यांनी खबरदारी घ्यावी व अशा खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास दि.१०.४.२०२३ पर्यंत शासनास सादर करणे बंधनकारक राहील.

९. सदर रक्कम वितरीत झाल्यानंतर या रक्कमेतून खर्च केलेल्या रक्कमांचा तपशील प्रत्येक महिन्याला राज्य शासनास सह/उप सचिव (नवि-१० / नवि-२७), नगर विकास विभाग, मंत्रालय यांना सादर करण्यात यावा. तसेच लेखापरिक्षणासाठी शासनांस/शासनाने नियुक्त केलेल्या यंत्रणेस उपलब्ध करून देण्यात यावा.

१०. सदर योजनेच्या भाग-६ अंतर्गत केंद्र शासनाकडून प्राप्त झालेल्या कर्जावरील व्याज “०२१७- नगर विकास, ६०- इतर नगर विकास योजना, ८०१- अनुदानग्राहीकडून अखर्चित शिलकींवरील व्याज किंवा इतर जमा रकमा, (०१) व्याज, (०१)(०१) सिंगल नोडल एजन्सी खात्यातील अखर्चित

शिलकींवरील व्याज (०२१७०२१२)” या लेखाशिर्षाखाली राज्य शासनाकडे जमा करावे व भरणा केलेल्या रक्कमेच्या चलनाची प्रत शासनास सादर करावी.

११. केंद्र शासनाच्या वित्त विभागाने दि.६.४.२०२२, दि.६.७.२०२२ व दि.१६.१२.२०२२ रोजीच्या मार्गदर्शक सूचना विचारात घेवून प्रकल्पनिहाय वितरीत करण्यात आलेला निधी खर्च करावा तसेच राज्य शासनाच्या दि.१.७.२०२१ अन्वये दिलेल्या सूचनांचे पालन करणे बंधनकारक आहे.

१२. सदर निधी वितरण आदेश वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र.५ येथील परिपत्रकानुसार प्राप्त अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा सांकेतांक २०२३०३२७२२१२५४९६२५ असा आहे. सदर शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Digitally signed by SHINDE SUBRAO NARAYAN
Date: 2023.03.29 12:39:23 +05'30'

**(सु.ना.शिंदे)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल, महाराष्ट्र राज्य,यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव,मंत्रालय, मुंबई.
३. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
४. अपर मुख्य सचिव (नवि-१), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
७. प्रधान सचिव ( नवि-२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
८. उपाध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, सिडको,मुंबई.
९. संचालक, नगर रचना आणि मुल्यनिर्धारण विभाग, पुणे.
१०. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता)-१/२, मुंबई / नागपुर
११. महालेखापाल, (लेखापरिक्षा)- १/२, मुंबई/ नागपुर
१२. निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई
१३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१४. सह सचिव (नवि-१०), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१५. उप सचिव (नवि-७), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१६. उप सचिव (नवि-४, नवि-३१), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१७. निवड नस्ती (नवि-१०)